राज्य लोकसेवा हक्क आयोग,नाशिक या कार्यालयासाठी नाशिक येथील खाजगी जागा भाडेतत्वावर घेण्यासाठी मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**क्रमांक:आरटीएस-२०२२/प्र.क्र.६०/लोकशाही दिन कक्ष**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२

दिनांक:- ०३ मार्च,२०२३

वाचा:- १) महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५

२) महाराष्ट्र राज्य मुख्य लोकसेवा हक्क आयोग, यांचे नस्ती क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६४ /मुसेहआ/कक्ष१,दि.१० जानेवारी, २०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य लोकसेवा हक्क अधिनियम,२०१५ हा संपूर्ण महाराष्ट्र राज्यात लागू झाला असून तो दिनांक २८ एप्रिल,२०१५ पासून अंमलात आला आहे. सदर अधिनियमातील कलम १३ अन्वये या अधिनियमातील प्रयोजनाकरीता "महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग" गठीत करण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. अधिनियमाच्या सदर तरतुदींच्या अनुषंगाने "महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग" अंतर्गत एक "राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त" कार्यालय तसेच विभागीय स्तरावरील एकूण सहा "राज्य सेवा हक्क आयुक्त" यांची कार्यालये निर्माण करण्यात आली आहे. त्यानुषंगाने दिनांक १ डिसेंबर,२०२१ पासून राज्य सेवा हक्क आयुक्त,नाशिक हे कार्यालय सुरू झाले आहे. सदर कार्यालयास भारत संचार निगमकडील (बी.एस.एन.एल.) मायको सर्कलजवळील सुमारे १६०० चौ.फु.जागा दरमहा रू.५०.०० हजार या दराने भाडेतत्वावर घेण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम,२०१५ ची प्रभावी अंमलबजावणी व्हावी,याकरीता राज्य सेवा हक्क आयुक्त,नाशिक या कार्यालयास भारत संचार निगमकडील (बी.एस.एन.एल.) मायको सर्कलजवळील सुमारे १६०० चौ.फु.जागा दरमहा रू.५०.०० हजार या दराने भाडेतत्वावर घेण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदरहू जागेसाठी कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,नाशिक यांनी दरमहा रू.५०,०००/- ( अक्षरी रू. पन्नास हजार फक्त) हे वाजवी असल्याचे प्रमाणित केले आहे.

२. सदर प्रकरणी होणारा खर्च राज्य सेवा हक्क आयोगाशी संबंधित **मागणी क्र. ए-४, २०७०-इतर प्रशासनिक सेवा, (८००) इतर खर्च, (००) (११) राज्य सेवा हक्क आयोग, (१०) कंत्राटी सेवा - संगणक सांकेतांक २०७० A००२** या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा

३. वरीलप्रमाणे खर्चास शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-चार, अनुक्रमांक-११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार मंजूरी देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३०३१५३४३८९००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shwetambari Pravin Khade

Digitally signed by Shwetambari Pravin Khade
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=9d702814ac9e8ff679064b8a4828e61adaa1acd78f420928f8e5191c2576b1a1, pseudonym=490D09740F52BFAA922859817C45AC7FB24C2A8D, serialNumber=8E3CFF5145F3538CC2FD3C8534F86EEB0CA96EE4F337FAF9D77EF01A5CC23B6B, cn=Shwetambari Pravin Khade
Date: 2023.03.03 15:38:51 +05'30'

**(श्वे.प्र.खडे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) अपर मुख्य सचिव (प्र.सु.र.व का.) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई
३) महालेखापाल (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई
४) राज्य मुख्य लोकसेवा हक्क आयुक्त,नवीन प्रशासकीय इमारत,मंत्रालयासमोर,मुंबई-०३२
५) राज्य लोकसेवा हक्क आयुक्त,नाशिक
६) निवड नस्ती/लोकशाही दिन कक्ष.